**अस्थायी पदांचे स्थायी पदांत**
**रुपांतर करण्यास मान्यता.**
**जिल्हा न्यायालय, सातारा.**

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग,मंत्रालय,**
**शासन निर्णय क्रमांक :-अस्थायी-०९१६/६९८/प्र.क्र.१३१/का-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक :- २१ डिसेंबर,२०१६.**

वाचा :- १) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्र.अेएचसीटी-१००२/१२८९(१६२)-नऊ, दि. ०८.०९.२००३.
२) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.टीईपी-२००२/प्र.क्र.१३/सेवा-३, दि.२१.०६.२००६
३) विधी व न्याय विभाग, शासन ज्ञापन क्र. अस्थायी-०९१५/७६१/प्र.क्र.१५४/कार्या-११, दि.०८.०३.२०१५.
४) जिल्हा न्यायालय, सातारा यांचे पत्र क्र.बी/रिटर्न/१४/१०४४०/२०१६, दि. ०८.१२.२०१६ चे पत्र.

प्रस्तावना :-

वित्त विभागाच्या उपरोक्त क्र.२ च्या शासन निर्णयानुसार ज्या विभागाने पदांचा आढावा पूर्ण केलेला आहे व आढाव्याअंती निश्चित केलेल्या आकृतीबंधास मुख्य सचिव समितीची मान्यता घेतलेली आहे, अशा विभागातील एकूण पदांच्या ८० % पदे काय़म करण्यास अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. तथापि, उपरोक्त क्र.१ च्या शासन निर्णयानुसार न्यायिक आस्थापनांना पदविषयक आढावा घेण्याबाबत सूट देण्यात आली आहे.

जिल्हा न्यायालय, सातारा यांनी त्यांच्या आस्थापनेवरील आकृतीबंधानुसार असलेल्या मुदतवाढ देण्यात आलेल्या २७७ अस्थायी पदांपैकी १५५ अस्थायी पदांना स्थायी करण्याबाबत मागणी केली आहे. त्याअन्वये, जिल्हा न्यायालय, सातारा यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे स्थायी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

वित्त विभागाच्या उपरोक्त क्र.१ वरील दि.२१.०६.२००६ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा न्यायालय, सातारा यांच्या आस्थापनेवरील एकूण २७७ अस्थायी पदांपैकी **१५५ अस्थायी पदांना स्थायी** करण्यास पुढील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

## विवरणपत्र

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांना मान्यता देण्यात आलेल्या स्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | अधिक्षक | ३ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १ |
| ३ | सहायक अधिक्षक | २० |
| ४ | लघुलेखक (निम्न श्रेणी) | १८ |
| ५ | वरिष्ठ लिपिक | २८ |
| ६ | कनिष्ठ लिपिक | ५२ |
| ७ | प्रमुख बेलिफ | ८ |
| ८ | बेलिफ | ७ |
| ९ | शिपाई | १० |
| १० | पहारेकरी | ४ |
| ११ | सफाई कामगार | ४ |
| | **एकूण पदे** | **१५५** |

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या क्र.टीईपी-२००२/प्र.क्र.१३/सेवा-३, दि.२१.०६.२००६ च्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०७१६१२५९१८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Neeraj Pradip Dhote

Digitally signed by Neeraj Pradip Dhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=LA Cum Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=714efbf760da6c143fdf63d5ec3da8a8957b82d41451a5f202043ce4895e4205, cn=Neeraj Pradip Dhote
Date: 2017.01.07 16:16:48 +05'30'

**(नीरज धोटे)**
**विधि सल्लागार नि सहसचिव**

**प्रती,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मा. राज्यमंत्री, विधी व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक,
३. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई (पत्राने),
४. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,सातारा,
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
६. महालेखापाल, (लेखापरीक्षा)-१, मुंबई,
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा,
११. वित्त विभाग, व्यय-५/सेवा-३/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई ,
१२. विधी व न्याय विभाग, का- ६, २३ व २४,
१३. निवडनस्ती.